**“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत “सिंदखेड राजा जिजाऊसृष्टी येथे सोयीसुविधा पुरविणे” करीता निधी वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४ /प्र.क्र.८२/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२४

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन पत्र क्र. संकिर्ण-८२२३/प्र.क्र.४१३/सां.का.४, दिनांक २६ डिसेंबर, २०२३
२) जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा शासन आदेश जा.क्र. जिनिस/सिविआ/२६५/२०२४, दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ४ डिसेंबर, २०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र.१ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवानिमित्त जिल्हाधिकारी, बुलढाणा यांना “सिंदखेड राजा जिजाऊसृष्टी येथे सोयीसुविधा पुरविणे” याकरीता रुपये ४९.७८ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील आदेशान्वये जिल्हाधिकारी, बुलढाणा यांनी रुपये ४९.७१ कोटी इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत जिल्हाधिकारी, बुलढाणा यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत “सिंदखेड राजा जिजाऊसृष्टी येथे सोयीसुविधा पुरविणे” याकरीता जिल्हाधिकारी, बुलढाणा यांना रुपये ४९,७१,००,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास कोटी एकाहत्तर लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर निधीचा विनियोग सिंदखेड राजा परिसर विकास योजनेंतर्गत समाविष्ट बाबी वगळून व मा. लोकप्रतिनिधींनी यांनी मागणी केलेली कामे वगळून इतर अन्य कामांकरीता करणे बंधनकारक आहे.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, त्यांना जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचे कार्यालयातील अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत

आहे. संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

जिल्हाधिकारी, बुलढाणा यांनी सदर प्रयोजनार्थाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करावे. तसेच, वेळोवेळी प्रगती संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५०-२०२४/व्यय १५, दि. २० मार्च, २०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३२९१४२१५०९३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2024.03.29 14:31:43 +05'30'

**( महेश किसन वाव्हळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. सर्व सन्माननिय कोअर समिती सदस्य
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव ( सां.का.३/४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. जिल्हाधिकारी, बुलढाणा
७. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१५. निवड नस्ती, सां.का.४.